सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर तरतूदीमधून राज्यातील कारागृहात बॅगेज स्कॅनर मशिन खरेदी करण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.१७४/तुरुंग-२

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: १० सप्टेंबर, २०१४

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. मेन्टेनन्स/सुरक्षाउपकरणे/४३७५/ २०१४-१४/कक्ष-६, दिनांक १६.०४.२०१४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र. ११०/अर्थसंकल्प-३, दिनांक १.०७. २०१४.

**शासन निर्णय**

राज्यातील खालील कारागृहातील सुरक्षा व्यवस्थांचे आधुनिकीकरण करणे याकरिता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर तरतूदीमधून रुपये १८१.३० लक्ष (रुपये एक कोटी एक्यांशी लक्ष तीस हजार फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून राज्यातील कारागृहात वैद्यकीय उपकरणांतर्गत तळोजा, कोल्हापूर, नाशिकरोड, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या सहा मध्यवर्ती कारागृहात प्रत्येकी एक नग बॅगेज स्कॅनर प्रती नग रु.३०.२० लक्ष या प्रमाणे एकुण रू. १८१.२० लक्ष इतक्या किंमतीची बॅगेज स्कॅनर मशिन खरेदी करण्याचे वरील वाचा-१ येथील पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. राज्यातील कारागृहात वैद्यकीय उपकरणांतर्गत तळोजा, कोल्हापूर, नाशिकरोड, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या सहा मध्यवर्ती कारागृहात प्रत्येकी एक नग बॅगेज स्कॅनर प्रती नग रु.३०.२० लक्ष या प्रमाणे एकुण रू. १८१.२० लक्ष इतक्या किंमतीची बॅगेज स्कॅनर मशिन खरेदीच्या अंदाजपत्रकास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरहू उपकरणांची खरेदी विहित कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५ मे, २००९ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक-४, नियम ७ मधील स्तंभ ६ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटीस अधीन राहून तसेच प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र. बी-५ मुख्य लेखाशीर्ष २०५६- तुरुंग (००) (१८) तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थांचे आधुनिकीकरण करणे (२०५६ ०२२२) ५२, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखा शीर्षाखाली उपलब्ध होणा-या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०७.२०१४ सोबत जोडलेल्या महाराष्ट्र विनियोजन २०१४ च्या परिशिष्टातील अ.क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांच्या स्वरुपात अथवा व्याप्तीत बदल होत नसल्यामुळे प्रस्तुत प्रकरणाच्या खर्चास नियोजन विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता घेण्याची आवश्यकता नाही. राज्यातील तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थांचे आधुनिकीकरण करणे यासाठी लागणारी यंत्रसामुग्री/मशिनरी खरेदी करण्यासाठी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत योजनेच्या मंजूर झालेल्या रुपये १८१.३० लक्ष (रुपये एक कोटी एक्यांशी लक्ष तीस हजार फक्त) इतक्या रक्कमेपैकी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०७.२०१४ नुसार ६० % रक्कम म्हणजेच रु. १,०८,७८,०००/- ( रु. एक कोटी आठ लक्ष अठ्ठयाहत्तर हजार फक्त) खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१४०९१०१४४८३१७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.09.11 12:33:58 +05'30'

**( र. ई. गिरी )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विशेष पोलीस महानिरीक्षक व कारागृह उपमहानिरीक्षक, (दक्षिण विभाग)/मुंबई
४. कारागृह उपमहानिरीक्षक, (मध्य विभाग)/औरंगाबाद.

५. कारागृह उपमहानिरीक्षक, (पूर्व विभाग)/ नागपूर
६. कारागृह उपमहानिरीक्षक, (पश्चिम विभाग)/ पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य २ नागपूर
१०. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य २ नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ ठाणे/ नाशिक/ बुलढाणा/ नागपूर/ उस्मानाबाद/ नांदेड / धुळे/ रत्नागिरी/ औरंगाबाद/ यवतमाळ/कोल्हापूर/ अमरावती/ अकोला/ बीड/ सातारा.
१२. अवर सचिव (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१३. निवड नस्ती (तुरुंग-२)